“स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” या एकछत्री योजनेतंर्गत, “३५० वा शिवराज्याभिषेक सोहळा” या महोत्सवाच्या निमित्ताने, “मोडी लिपीचा प्रचार व प्रसार” करणे कामी महाराष्ट्रातील विद्यापीठांमध्ये एकदिवसीय कार्यशाळा राबविण्यासाठी येणा-या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मपुवि २०२३/प्र.क्र.१५१/सां.का.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-३२.
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २२ ऑगस्ट, २०२३.

वाचा: संचालक, पुराभिलेख संचालनालय पत्र जा.क्र. पुरा.संचा/प्रकाशन/छशिमदुप/२०२३/बी -२०३४,दि.१९.०७.२०२३.

**प्रस्तावना-**

छत्रपती शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाचे ३५० वे वर्ष असल्याने वर्षभर विविध कार्यक्रमांचे आयोजन करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्याप्रित्यर्थ कार्यक्रमाची आखणी करण्यासाठी दिनांक १५ जुलै, २०२३ रोजी मा.मंत्री(सां.का.) यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत पुराभिलेख संचालनालय, मुंबई या कार्यालयामार्फत मोडी लिपीचा प्रचार व प्रसार करण्यास्तव महाराष्ट्रात मोडी लिपी विषयावरील कार्यशाळा आयोजित करण्याचे व त्याकरीता रू.१०.०० लक्ष इतका निधी देण्याचे निर्देशित केले आहे. त्यानुषंगाने संचालक,पुराभिलेख संचालनालय, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये, मोडी लिपी विषयावरील कार्यशाळा आयोजित करण्यास व त्याकरीता रू.१०.०० लक्ष खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

**शासन निर्णय :-**

“स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” या एकछत्री योजनेतंर्गत, “३५० वा शिवराज्याभिषेक सोहळा” या महोत्सवाच्या निमित्ताने, पुराभिलेख संचालनालयामार्फत, मोडी लिपीचा प्रचार व प्रसार करण्यास्तव महाराष्ट्रातील १४ विदयापीठांमध्ये (एक दिवसीय) मोडी लिपी विषयावरील कार्यशाळा आयोजित करण्यास व एक दिवसीय कार्यशाळेसाठी येणा-या खालील तक्त्यात दर्शविण्यात आल्यानुसार अंदाजित खर्च रू.७२,०००/- (अक्षरी रूपये बहात्तर हजार फक्त) याप्रमाणे १४ (एक दिवसीय) कार्यशाळेवरील अपेक्षित खर्च रू.१०,०८,०००/- (अक्षरी रूपये दहा लक्ष,आठ हजार फक्त) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशिल | अंदाजित खर्च |
|---|---|---|
| १ | वाचन सामग्री, चक्रमुद्रण (Cyclostyle), प्रतीमुद्रा (Xerox) व छपाई (Print) | रू.२०,०००/- |
| २ | ध्वनिक्षेपण यंत्रणा, उदघाटन समारंभ खर्च | रू.७,०००/- |
| ३ | स्टेशनरी (फाईल्स फोल्ड, नोट बुक, पेन, इ.) प्रत्येक प्रशिक्षणार्थ्यांना | रू.१५,०००/- |
| ४ | प्रसिद्धीवरील खर्च (फ्लेक्स) | रू.८,०००/- |
| ५ | तज्ञ व्याख्याते मानधन (प्रती व्याख्यान रु. ३,०००/- प्रमाणे) | रू.१२,०००/- |
| ६ | वाहतूक खर्च, चहापान खर्च | रू.१०,०००/- |
| | **एकूण खर्च** | रू.७२,०००/- |

२. सदर कार्यशाळेचा जास्तीत जास्त इच्छूकांना लाभ व्हावा यासाठी विद्यापीठातील सभागृहाची आसन क्षमता पाहून सदर कार्यशाळेसाठी जास्तीत जास्त प्रसिध्दी देण्यात यावी. सदरची कार्यशाळा विनामूल्य असल्याचेही प्रसिध्दीपत्रकात नमूद करावे. प्रसिध्दी केवळ विद्यापीठापुरती मर्यादित न ठेवता आजूबाजूची कार्यालय येथील फलकावरही त्याचे प्रसिध्दीपत्रक लावण्यात यावे. एक दिवसाच्या कार्यशाळेमध्ये प्रशिक्षणार्थींमध्ये उत्सुकता व शिकण्याची आवड निर्माण होईल मात्र पुढे कोणतीही दिशा नसल्याने या कार्यशाळेचा हेतू सफल होणार नाही. मोडी लिपीचा प्रसार व प्रचार व्हावा याकरीता दहा दिवसांचा मोडी लिपी प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करावा व सदर एकदिवसीय प्रचार व प्रसार कार्यशाळेत दहा दिवसीय मोडी लिपी प्रशिक्षण कार्यक्रमाची घोषणा प्रशिक्षणांचे ठिकाण, वेळ, दिनांक यासह करावी.

०३. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक "झेडडी-२, प्रधान लेखाशिर्ष २२०५ कला व संस्कृती (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव (१३) (०१) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ ३७३३), ५०- इतर खर्च" या लेखाशिर्षाखालील सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

०४. संचालक,पुराभिलेख संचालनालय,मुंबई यांना यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या, वि.अ.प्र.-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-दोन, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका१९७८, भाग-एक, उपविभाग -तीन अ.क्र.४, परिच्छेद २७ (२) (अ) नुसार प्रशासकीय विभागास असलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०८२२१८०७३०९०२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUMANT
DINKAR
PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120,
pseudonym=565ADED7321B71A5B0327BA1F7149AED1F618E4E,
serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2023.08.22 18:11:41 +05'30'

**( सु.दि.पाष्टे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. उप सचिव(अर्थसंकल्प) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई

९. उप सचिव,नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. उप सचिव (व्यय-१५, वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
१४. अवर सचिव (सां.का.४), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. अवर सचिव (अर्थसंकल्प) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. संचालक, पुराभिलेख संचालनालय,मुंबई.
१७. निवड नस्ती, सां.का.२